## श्रीदत्तात्रेयांचे चोवीस गुरू

श्रीमद्भागवताच्या एकादश स्कंधात व एकनाथी भागवताच्या ७, ८ व ९ या अध्यायांत यदु व अवधूत यांचा संवाद आला आहे. त्यात आपल्या २४ गुरूंची सविस्तर हकीगत दत्तप्रभूंनी यदुराजास सांगितली आहे. 'जो जो जयाचा घेतला गुण । तो तो गुरु म्यां केला जाण ।' अशी व्यापक कल्पना या गुरुतत्त्वात आहे. जो गुण ज्यापासून घेतला तो गुरू झाला; तसेच जो गुण ज्याच्या उदाहरणावरून त्यागला तोही गुरू झाला. 'ज्याचा गुण घेतला । तो सहजें गुरूत्वा आला । ज्याचा गुण त्यागरूपें घेतला । गुरु झाला अहित त्यागें ॥' (एकनाथी भागवत ७/३४२). शुक्राचार्यांची कन्या देवयानी आणि ययातीराजा यांचा ज्येष्ठ पुत्र म्हणजे यदुराजा. त्याला राज्य न मिळता शर्मिष्ठेचा मुलगा पुरूरव्याला राज्य मिळाल्यामुळे यदुराजा कष्टी होऊन, वैराग्य प्राप्तीसाठी रानावनात भटकत असताना त्याने श्रीदत्तप्रभूंची आराधना केली. त्याला स्वात्म्यैक रहस्य सांगण्यासाठी श्रीदत्तात्रेय अवधून रूपाने त्याच्यासमोर प्रकट झाले ('संकल्प विकल्परहित । शुद्ध सर्वांगी विभूत । या लागीं बोलिजे अवधूत ॥' किंवा 'अहं धुवी तो अवधूत' अशी अवधूताची लक्षणे एकनाथांनी सांगितली आहेत. गुरुविण आत्मप्राप्ती । सर्वथा न घडे गा नृपती ।' असा दत्तसंप्रदायाचा सिद्धान्त आहे.) यदुराजाने विचारलेल्या प्रश्नांना उत्तर देताना श्रीदत्तावधूत म्हणाले, 'मला लाधले तत्त्वज्ञान । तेणे असा होऊन राहिलों ॥ हे तत्त्वज्ञान जाण । म्यां चोवीस गुरूंपासून । यानें केलें संपादन । तें सांगेन तुज आतां ॥

१) अनुक्रमें करून । सांगतो तत्त्वज्ञान । पहिला गुरु पृथ्वी जाण । दुसरा पवन तो गुरु ॥ २) हें व्योम तिसरा गुरु । चौथा उदक गुरु । पांचवा जाण अग्नि गुरु । सहावा गुरु चंद्रम ॥ ३) सूर्य कालात्मा सातवा गुरु । कपोत आठवा गुरु । नववा अजगर गुरु । दहावा गुरु समुद्र ॥ ४) तो होय अकारावा गुरु पतंग । बारावा गुरु भृंग । तेरावा गुरु मातंग । मधुहा (मधुमाशी) गुरु चौदावा ॥ ५) मृग मम गुरु पंधरावा । मत्स्य गुरु सोळावा । पिंगळा वेश्या गुरु सतरावा । गुरु अठरावा कुरर (टिटवी) ॥ ६) जे तीव्र मानापमान चिंता । तत्त्वपरिहाराकरितां । बालक गुरु तत्त्वता । हा आता एकोणिसावा ॥ ७) कंकण कुमारीचें विसावा गुरु । एकविसावा सर्प गुरु । बाविसावा गुरु शटकार (बाण

करणारा) जाण तू ॥ ८) मम गुरु तेविसावा । पेशस्कार (कुंभारीण माशी) जाणावा । कोळी गुरु चोविसावा । ज्ञानार्पण घे यापासुनी ॥

**१) श्रीदत्तावधूतांचा पहिला गुरु पृथ्वी** असून तिच्यापासून त्यांनी क्षमा, शांती, दया व अचलख हे गुण घेतले. पृथ्वी नेहमी क्षमाशील असते. 'ही क्षमा ज्याचे पदरीं । त्याला ब्रह्मांडोदरी । कोणी न दिसती वैरी । पृथ्वीपरी ॥ पृथ्वींवरील पर्वत आणि वृक्ष हेही गुरुसमान आहेत. वृक्ष सतत उपकार करीत असतात. पर्वतांमुळे नाना रत्ने, नद्या, गुहा, वनसृष्टी यांचा लाभ मानवाला होतो. सकाळी उठल्यावर विष्णूची पत्नी मानलेल्या पृथ्वीची आपण प्रार्थना करतो, 'समुद्रवसने देवि । पर्वतस्तनमंडले । विष्णुपत्नि नमस्तुभ्यं पादस्पर्शं क्षमस्व मे ॥

**२) दुसरा गुरु वायू म्हणजे वारा.** तो कोणत्याही बाबतीत आसक्त नसतो. शरीरातील प्राणवायू, मिळेल ते आंबटगोड सेवून, त्याचे पचन करतो. वारा सर्वत्र असतो, परंतु कोणाच्याही हातात सापडत नाही. अंगाला स्पर्श करतो पण दिसत नाही. विविध प्रकारचे बरे वाईट गंध किंवा वास वाहून नेतो. परंतु वारा त्या वासांनी लिप्त होत नाही. विषय सर्वभैव टाकावे । असेही स्वयें न टाकावे आपोआप ते सुटावे । तरीच बरवेवैराग्य ॥ (भागवत, ११/४७/५९-३०). वायूचा अलिप्तपणा ही स्वीकारून संसारात वागावे.

**३) तिसरा गुरु व्योम म्हणजे आकाश.** ज्याला अंतच नाही ते आकाश. त्याच्या पोकळीत चंद्र, सूर्य, ग्रह, तारे वावरतात. आकाश अभंगात अविनाशी असून, ते कोणत्याही उपाधीत गुंतत नाही. निर्मळ, निश्चल आणि निर्दोष असे आकाश म्हणजे या ब्रह्माण्डाचे झाकणच. ते दिसते, पण हाती येत नाही. समता, असंगती, अभेदता, निर्मळता हे गुण आकाशापासून दत्तांनी घेतले. फुटे मृत्तिकेचा पिंड । तेवी महतां देहपिंड । आत्मा न मरे जो सुदृढ । तो अखंड अज सदैव ॥ हा अमरत्वाचा, अखंडत्वाचा संदेश आकाश देत असते. आकाशात वीज चमकून जाते तरी तिची बाधा आकाशावर नसते. आत्मा असाच निर्लेप असतो.

**४) चौथा गुरु जल.** पाणी अत्यंत निर्मळ व पवित्र असते. 'गाईची तृषा हरूं । व्याघ्र विष होऊनी मारू । ऐसे नेणेचि गा करू । तोय जैसे ॥' पाणी सर्वांना सारखेच लागते. 'अमृतप्राय गोड बोलतां । सर्व वळती तत्त्वता उदकाला गुरु करितां । ये हातां हा गुण ॥' पाण्याची अमृतप्राय निर्मळता व

स्वच्छता अवधूतांना गुरुस्थानी वाटली. जळ पोटीं मळ ठेवून । बाहेर स्वच्छ असून । करी मलक्षालन । इतरांचे ॥' हा पाण्याचा विशेष गुण आहे.

५) **पाचवा गुरु अग्नी.** सर्व काही जाळणारा अग्नी तेजस्वी असतो. आहुती ज्या देवांची । देती तया ती पोंचवावयाची । हेही कामगिरी अग्नीची ॥ तो कधी संग्रह करीत नाही. अग्नी असे निराकार । काष्ठ मिळता तदाकार । दिसे तसा हा साकार । नाना शरीरयोगें आत्मा ॥

६) **सहावा गुरु चंद्र.** क्षय वृद्धी होत असली तरी चंद्र वस्तुतः अविकारीच असतो. सुखदुःखादी भावना निर्माण झाल्या तरी आत्मा निर्विकार असतो ते चंद्रापासून समजते. चंद्रमंडळाला विकार नसतो, हे तत्त्व महत्त्वाचे आहे. 'आत्मा न होयी न वाढे न मरे । हे विकार सारे । भूपा जाण देहाची । यावे चंद्रमंडळी कळा जशा ॥'

७) **सातवा गुरु सूर्य.** सूर्य अल्प घेऊन पुष्कळ देतो. समुद्राचे खारे पाणी किरणांनी शोषून घेऊन, सूर्य गोड पाणी देतो. सूर्यबिंब पाण्यात पडले तर सारे विकार त्या सूर्याला आहेत असे वाटते. परंतु सूर्य तत्त्वतः विकाररहित असतो. सूर्याचा घेण्यासारखा आणखी एक गुण असा, 'चराचर जगांत । जें जें दिसेल उपयुक्त । तें ठेवावें सुरक्षित । आपण आसक्त न होतां ॥ इष्ट काळ येताच सूर्य परोकारी वृत्तीने रक्षिलेले परतही करतो. सगळे संपले तरी सूर्य अंतरंगात खेद मानीत नाही. रागद्वेष सोडून । अनायासें अर्थ जोडून । यथाकाळीं पात्रीं सोडून । अलिप्त होऊन रहावें ॥' हा महत्त्वाचा गुण सूर्यापासून दत्तात्रेय शिकले.

८) **आठवा गुरु कपोत पक्षी म्हणजे कबूतर.** अति स्नेहामुळे, आसक्तीमुळे विशेषतः स्त्रीच्या प्रेमामुळे कसा नाश होतो हे कपोतापासून शिकावे. काममोहित कपोताला कपोतीशिवाय दुसरे जगच दिसत नाही. विषयभोगाशिवाय त्याच्या चित्तात दुसरा विषयच नसतो. अतिप्रेम, अति आसक्ती, बेभान वृत्ती, शेवटी नाशाला कारणीभूत होते. विषय सेवनाने मन कधीच तृप्त होत नाही. अतिरिक्त विषय सेवनाने एक कपोत कपोतीचे जोडपे नाश पावले अशी एक गोष्टही आहे. विषयी जे शांत न होऊन । घरीं राहती परिवारी रमून । कवड्यापरी सहसा काळ येऊन । परिवारासह मारून ने तया ॥ अशी अवस्था होऊ नये म्हणून आपण कोठेही फार आसक्ती ठेवून वागू नये. प्रपंचाचा फोलपणा ध्यानात ठेवावा.

९) **नववा गुरु अजगर.** कल्याण किंवा अकल्याण आपोआप घडून येते हा संदेश अजगर देत असतो. परतंत्र इंद्रियसुख । सर्वांसी समान देख । आदि अंती सर्वत्र दुःख । मध्ये हा सुखभासपात्र ॥' मनीं खंत न धरून । आत्र (अजगर) राहे पडून । तसे रहावे उदासीन । नित्य धरून अजगरवृत्ती. अजगर पोट भरण्यासाठी काहीही प्रयत्न न करता जागीच बसून वारा पिऊन राहतो. जवळ एखादा पदार्थ आला तरच खातो. विवंचना, धावाधाव करीत नाही.

१०) **दहावा गुरु समुद्र.** गंभीरता, निर्मळता आणि आनंदी वृत्ती हे समुद्राचे गुण, दत्तात्रेयांनी घेतले. समुद्र आपल्या मर्यादेचे उल्लंघन करीत नाही. तो नित्य पूर्ण असतो. तो नित्य पूर्ण असून । वर्षाकाळी नद्या येऊन । मिळतांन जाय फुटून । हर्षे वेळा सोडून बाहेर ॥ विविध नद्या त्या ग्रीष्मीं वाळती । समुद्रा न मिळती । तरी दुःखे वाळे न सदिप्तत्यती । ती रीती घ्यावी ॥' समुद्राच्या अंतरंगाप्रमाणे योग्याच्या अंतःकरणाचा ठाव लागत नाही. तो नेहमीच प्रसन्न असते. 'सदा पूर्ण समुद्रापरी । प्रसन्नता दावावी बाहेरी । हें समुद्रापासून स्वीकारीं । ऐसा संदेश दत्त घेती ॥'

११) **अकरावा गुरु पतंग.** पतंग म्हणजे दिव्याच्या ज्योतीवर झडप घालणारा एक कीटक. पुरुषाच्या नाशाला स्त्रीसंग कसा कारणीभूत होतो हे पतंगावरून समजते. जो न करी इंद्रिये स्वाधीन । स्त्रियांचे विलासलावण्य पाहून । जाई मोहित होऊन । पतंगासमान मरे तो ॥' हाडामांसाचा एक गोळा म्हणजे स्त्री. तिच्या रूपावर पुरुष आसक्त झाला तर दिव्याच्या ज्योतीवर झडप घालणाऱ्या पतंगाप्रमाणे त्याची स्थिती होते. 'जो जाय नर भुलुनी । पाहतां नवी रमणी । फडीं विलासिनी तरुणी । तो व्यर्थ मरून जाईल । वस्त्रे मणी सुवर्ण भूषण । टिके टिके भांग सोडून । पाहतां काय ये दिसून । प्रेतासमान जे असे ॥'

१२) **बारावा गुरु मधमाशी.** अतिसंग्रही वृत्तीमुळे मधमाशीचा नाश होतो. धनाचा अतिलोभ धरल्याने हानीच होणार. मधमाशा उंच उंच वृक्षावर हिंडून मध गोळा करतात, स्वतः चाखीत नाहीत, इतरांना देत नाहीत. शेवटी, यत्नें त्यां जाळून सर्वथा । लोक नेती तो मधु ॥ तेव्हां जो सांठा करी । त्याचा उपयोग न करी । तो त्या साठ्याबरोबरी । खरोखरी नाश पावेल ॥' हा संदेश मधुमाशीमुळे मिळतो.

१३) **तेरावा गुरु म्हणजे हत्ती.** अंगात प्रचंड उन्मत्तता असलेला हत्ती हत्तिणीच्या संगतीत बेसावधपणे धावतो व खड्यात पडून जन्मभर गुलामगिरी

भोगतो. हत्ती वेडावाकडा चालत नाही. तो सरळ चालतो. रस्त्याने जाताना कुत्री भुंकली तरी त्याची चिंता त्याला नसते. पायाखालची धूळ उचलून हत्ती सोंडेने आपल्या डोक्यावर टाकतो. ही वृत्ती निरभिमानी असून सर्वांना वंदन करण्याची आहे. त्यामुळे अहंतेची कवचे गळून पडतात. सर्व ठिकाणी असलेले ब्रह्म मीच आहे अशी जाणीव झाली की द्वैत कोठे उरतच नाही, आणि मग योगी ब्रह्मानंदात डोलू लागतो.

१४) **चौदावा गुरु भ्रमर.** भुंगा फुलांना त्रास न देता त्यांच्यातील मध चाखतो. त्याचे मन कोमल व निर्मळ असते. तसेच योगी मनुष्याने कोणाला न दुखविता जे मिळेल त्यात समाधान मानावे. योगी एके ठिकाणी न रमता भ्रमराप्रमाणे विविध ठिकाणी भ्रमण करतो आणि भिक्षाटन करून जगतो. नाना फुलांचे जसे विविध मधु स्वाद. तसे अवधूताला भिक्षेत विविध स्वाद मिळतात.

१५) **पंधरावा गुरु मृग म्हणजे हरीण.** संगीताच्या मंजुळ नादाला हरीण लुब्ध होतो व शिकाऱ्याच्या जाळ्यात सापडतो. तसाच वेश्यांच्या नाद माधुर्याला मोहित होऊन छंदीफंदी मनुष्य नाश पावतो. 'मृग तंत्रीवरी होता लीन । मृगचू (पारधी) त्याचे करी बंधन । त्यापासूनच घेतले शिक्षण । नाद सोडून द्यावया ।। भगवद्भक्ती शिवाय गायन म्हणजे कोल्हेकुईच होय. ऋष्यश्रृंगमुनी स्त्रियांच्या नृत्य गायनादि लुब्ध होऊन बद्ध झाला.

१६) **सोळावा गुरु मत्स्य म्हणजे मासा.** गळाला लावलेला मांसाच्या तुकड्याच्या लोभामुळे मासा प्राणाला मुकतो. जिभेवर ताबा ठेवणे अगत्याचे आहे असा यावरून बोध मिळतो.

१७) **सतरावा गुरु पिंगला वेश्या.** लग्न न करता, प्रत्येक दिवशी नव्या पुरुषाला उपभोग देणारी पिंगला वेश्या दत्तात्रेयांची गुरु कशी ? स्त्रीची सुवर्णापरी दीप्ती । नवयौवन चंद्रकांती । तिला पाहतां वस्त्रे गळती । नरांची मती भ्रष्ट होई ।। ती धनप्राप्तीसाठी आपला देह विकीत असे. परंतु एके दिवशी तिच्या मनात वैराग्य उत्पन्न झाले. 'जो विश्वाधार अंतर्यामी रमण । तो रती अर्थ देऊन । रमणी तया सोडून । भयशोक मोहदा कां इच्छी ? ।। मी अनित्य मर्त्या इच्छीं मला । धिक्कार असो ये वेळा । हा देह विकून विमला । आत्मारामा भजेन ।। अशा वृत्तीने पिंगला अंतर्मुख बनली. आशा नसे जयापाशी । सुखें निद्रा नये त्यासी ।। असा बोध श्रीदत्तांनी पिंगळेपासून घेतला.

१८) अठरावा गुरु टिटवी पक्षी. कुरर म्हणजे टिटवी पक्षी. त्या टिटवीने मांसाचा तुकडा न खाता तसाच राखून ठेवला. इतर पक्ष्यांनी ते पाहिले व ते तिच्याशी झुंज देऊ पागले. व्यर्थ संग्रह केला की दुःख येतेच. परिग्रह दुःखाला कारण । टिटवूपासून कळले ॥ जो विद्वान परिग्रहरहित ब्राह्मण । तो मिळें ते करी अग्निवत् भक्षण । तो सतत सुखी होई ॥

१९) **एकोणिसावा गुरु बालक.** लहान मुलाला उच्चनीच भाव नसतो. ते आपल्याच ठिकाणी रमलेले असते. जो भस्म किंवा चिखल । नेणें सुगंधी परिमल । सत्कार तिरस्कार सकल । नेणें बाळ निजानंदे । हा रज्जु किंवा सर्प । नेणे तो न करी अनुताप । जो नेणे पुण्य पाप । न घे कोप आपणांवरी ॥ धन कसे मिळवावे, कसे रक्षावे अशी चिंता बालकाला कधीच नसते. 'जो मनोरथ न करी । आपणा आपुल्याची क्रीडा करी । आपणांवरी प्रीती करी । यापरी बाळ सुखी ॥ रागद्वेषापासून रहित होणे हा बोध दत्तांनी बालकापासून घेतला.

२०) **विसावा गुरु कुमारी कंकण.** मुसळाने भात कांडणाऱ्या कुमारीच्या बांगड्यांचा आवाज होतो. तो आवाज न व्हावा म्हणून सगळी कंकणे काढावीत तर ते अशुभ. म्हणून एका कुमारीने दोनच कांकणे हातात ठेवली. तरी आवाज झालाच दोन वस्तू एकत्र आल्या की आवाज होणारच हे लक्षात येऊन तिने हातात एकच कंकण ठेवले. मग आवाज थांबला. एकान्त आला, या एकान्ताचा फ़ार मोठा लाभ झाला. दोहोंचे होई भाषण । एक असता घडे ध्यान ।' हा बोध मुलीच्या बांगडीपासून दत्तांनी घेतला.

२१) **एकविसावा गुरु सर्प.** सर्पापासून, एकाकी अवस्थेत राहून आत्मस्वरूपी रत होण्याचा गुण दत्तांनी घेतला. घर करण्याचे बंधनही साप कधीच ओढवून घेत नाही. विशदपणें न फिरे सर्प । निर्धोकाने न घे झोंप । निष्कारण आपोआप । न करी कोप कोणावरी ॥ हे संपूर्ण गुण घ्यावे । सर्पापरी वागावे । सिद्धस्थान लक्षावें । आयत्या घरात नागोबा जसा. झोपडी बांधली तरी तिच्यापासून कटकट व दुःख सुरू होणारच म्हणून स्वतःचे घर न बांधण्याचा बोध सर्पापासून घ्यावा.

२२) **बाविसावा गुरु शरकार.** शरकार म्हणजे धनुर्धारी. एक बाण तयार करणारा, शरकार टोकदार बाण बनविण्यात एकढा गर्क होता की त्याच्या पुढ्यातून राजा सहपरिवार, मोठ्या गजरपूर्वक गेला तरी त्याला त्याचे भान नव्हते. अनिवार मन एकसारखे इकडे तिकडे बहकत असते. 'मन हे

ओंढाळ गुरं । परधन परकामिनीकडेच ते धावे ।' एकाग्रतेवाचून कोणतेही काम कधीही नीट घडून येत नाही. शरकार गुरुंकडून दत्तांनी मनोजयासाठी एकाग्रता हा गुण घेतला. साधना करण्यासाठी मन एकाग्र व्हायला हवे. त्यासाठी मठ, गुंफा, मंदिर पाहिजे असेच काही नाही, तर साधनेवर अत्यंत दृढ निष्ठा व प्रेम हवे. शरकाराच्या उदाहरणावरुन हे दत्तात्रेयांच्या ध्यानात आले.

**२३) तेविसावा गुरु कुंभारीण नावाची माशी.** तिच्यापासून चिंतनशीलता व ध्यानमग्नता हा गुण दत्तांनी घेतला. भ्रमर या कुंभारीण कीटकाला पाहतो. म्हणून हा कीटक सतत त्याचेच ध्यान इतक्या तीव्रतेने करतो की, तो कालांतराने स्वतःच भ्रमर बनून जातो. माणसाने एकरूपत्वाचा ध्यास असाच घेतला, तर तोही परमात्मस्वरूप बनून राहील. जो वर्ण आश्रय जाती । सोडून सर्वदा चित्ती । चिंती ईश्वराची मूर्ती । त्याला गती तीच ये ॥ स्वयमेव ब्रह्म असून । ब्रह्माचेच करितां चिंतन ॥ जीव जाई ब्रह्म होऊन । हे आश्चर्य कोण मानील ?

**२४) चोविसावा गुरु कोळी हा कीटक.** अद्वैताचा उपदेश कोळ्यापासून, दत्तांनी घेतला, कोळी आपल्याच पोटातून धागे काढून जाळे विणतो आत ओढा करतो आणि शेवटी आपणच ते तंतू खाऊन टाकतो. परमात्मा या जगाचा विस्तार व संहार करून पुन्हा तो एकटा निर्विकार असतो. कोळी हा कीटक आपल्याच नाभीपासून सूत काढतो. त्याचे घर करून अहोरात्र त्यात विचित्र क्रीडा करीत राहतो व शेवटी ते सूत खाऊन टाकून एकटाच राहतो. तसा ईश्वर जग निर्माण करून त्याचे रक्षण करतो व शेवटी त्याचा संहार करून स्वतःतच रममाण होतो. हा बोध कोळ्यापासून श्रीदत्तात्रेयांनी घेतला.

याप्रमाणे चोवीस गुरु करुन नाना गुणांचा तसेच अवगुण ज्ञानाचा संग्रह दत्तात्रेयांनी केला. तो विष्णुव्यापक । मीच असे एक । असा घेतला विवेक । असे चोवीस गुरु करुन म्यां ॥ असे दत्तप्रभु सांगतात. यासाठी देवासही गुरु करुन शिक्षण घ्यावे लागते. मानवी देहाची यथार्थता वर्णन करताना दत्तमहात्म्यात शेवटी प. पू. वासुदेवानंद सरस्वती म्हणतात -